विभागाच्या विविध ई-गव्हर्नन्स प्रकल्पांकरीता आयुक्त, शिक्षण, पुणे यांचे कार्यालयास निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बैठक-२०२५/प्र.क्र.८/संगणक**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक:- २७ मार्च, २०२५**

**वाचा :-**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७.

२) प्रकल्प अंमलबजावणी समिती बैठकीची बैठक दि.२६.१२.२०२४.

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत विविध ई-गव्हर्नन्सचे प्रकल्प राबविण्यात येत असतात. सद्यस्थितीत गुगल एपीआय सेवेची रक्कम अदा करणे, पवित्र पोर्टलमार्फत शिक्षक पदभरती संदर्भात संबंधीत कंपन्यांना निधी वितरीत करणे, सर्व शाळा/ अंगणवाड्या/ केंद्र (MRSAC) द्वारे जिओ टॅगिंग करून छयाचित्रासह मॅप करणे संदर्भात MRSAC या संस्थेसमवेत करण्यात आलेल्या करारनाम्याच्या अनुषंगाने निधी वितरीत करणे असे प्रस्ताव आयुक्त, (शिक्षण), पुणे यांचे कार्यालयाकडून शासनास सादर करण्यात आले होते. सदर प्रस्तावास प्राप्त झालेल्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या मान्यतेनुसार प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढीलप्रमाणे आदेश करण्यात येत आहे.

**शासन निर्णय**:-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत विविध ई-गव्हर्नन्सचे प्रकल्प राबविण्यात येत असतात. त्यापैकी पुढील तक्यात नमूद करण्यात आल्यानुसार निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| क्र. | निधीचे प्रयोजन | आवश्यक निधी (रू.) |
|---|---|---|
| आयुक्त कार्यालयास वितरीत करावयाचा निधी | | |
| १ | सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षाच्या आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रियेकरिता घेण्यात आलेल्या गुगल एपीआय सेवेची रक्कम अदा करणेबाबत. | रू. १४,९९,९८९/- |
| २ | पवित्र पोर्टलमार्फत शिक्षक पदभरती संदर्भात संबंधीत कंपन्यांना निधी वितरीत करणे | रू. ७४,३४,०००/- |
| ३ | सर्व शाळा/ अंगणवाड्या/ केंद्र (MRSAC) द्वारे जिओ टॅगिंग करून छयाचित्रासह मॅप करणे करारनामा दि. ४.०२.२०२५ | रू. ९४,०७,७००/- |
| | **एकुण निधी** | रू. १,८३,४१,६८९ /- |

२. ई-गव्हर्नन्सच्या प्रकल्पांकरीता उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसर एकूण रु.१,८३,४१,६८९/- इतकी रक्कम ई-गव्र्हनन्सच्या "मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८००, इतर खर्च (०२) संकिर्ण (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२ एच ४५४), ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२५ च्या उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-२०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग-२ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५०/व्यय-५, दि.६.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२७१२५६४५२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT., 2.5.4.20=57b66327fd02392673b4ab4d6a85fdd38e27f3be70b7a6bddc9bea3f08d2330b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF01D0AB2AFFB124678E1A586450069BBD9E2CBC928A89E57C1B37706CB9F428, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2025.03.27 12:58:09 +05'30'

**(समीर सावंत)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.

२) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

३) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.

५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

७) अवर सचिव, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) कक्ष अधिकारी, रोखशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती,संगणक कार्यासन.